**आरे दुग्धवसाहतीतील आरे रूग्णालय बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे हस्तांतरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः एएमसी- २०२३/प्र.क्र.१८०/पदुम-१०

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२.

दिनांक: ११जून, २०२५

वाचा:

१. अतिरीक्त आयुक्त (प.उ.), बृहन्मुंबई महानगरपालिका यांचे अ. शा. पत्र क्र. अति. आयुक्त / प. उप. /१४७/डी, दि.०९.०६.२०२३

२. शासन समक्रमांकीत पत्र दि.०७.०३.२०२५

३. शासन समक्रमाकीत पत्र दि.२६.०३.२०२५

४. संचालक (वैद्यकीय शिक्षण व प्रमुख रूग्णालये), बृहन्मुंबई महानगरपालिका यांचक पत्र क्र.संचालक/वै.शि.प्र.रू./४८८, दि.२३.५.२०२५

प्रस्तावना:-

आरे दुग्धवसाहतीतील आरे रूग्णालयाच्या दुरावस्थेबाबत मा.मानवी हक्क आयोग येथे (सुमोटो केस क्र.४२७१/१३/१६/२०२२) याचिका दाखल झालेली असून, विधानमंडळाच्या अधिवेशनातही आरे रूग्णालयाच्या दुरावस्थेबाबत प्रश्न उपस्थित करण्यात आला होता. आरे रूग्णालयाबाबत उपस्थित प्रश्न व मानवी हक्क आयोगात दाखल याचिका विचारात घेता, सदर रूग्णालयाद्वारे रहिवाशांना आरोग्य सुविधा उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने आरे रुग्णालय बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे "जसे आहे तशा स्थितीत" हस्तांतरीत करण्यासाठी सहमती दर्शविण्याबाबत संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये बृहन्मुंबई महानगरपालिकेस कळविण्यात आले होते. सदर पत्राच्या अनुषंगाने बृहन्मुंबई महानगरपालिकेने त्यांच्या संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये आरे दुग्धवसाहतीतील आरे रूग्णालय "जसे आहे तशा स्थितीत" हस्तांतरीत करण्यास सहमती दर्शविली आहे. प्रस्तुत बाब विचारात घेता, आरे दुग्धवसाहतीतील आरे रूग्णालय "जसे आहे तशा स्थितीत" बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मौजे आरे, न.भू.क्र.३८ ता.बोरीवली या मिळकतीमध्ये असणारी आरे रूग्णालयाची इमारत (क्षेत्र.१२५७.९० चौ.मी.) व मौजे गोरेगांव न.भू.क्र.२५८/अ, ता.बोरीवली या मिळकतीमध्ये असणारी संलग्न शासकीय निवासस्थाने (क्षेत्र.६७४.३० चौ.मी.) असे एकूण क्षेत्रफळ १९३२.२० चौ.मी. इतके क्षेत्र " जसे आहे तशा स्थितीस " बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे ३० वर्ष कालावधीसाठी हस्तांतरीत करण्यात येत आहे.

आरे दुग्धवसाहतीतील आरे रूग्णालय बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे हस्तांतरीत करण्यासाठी हस्तांतरणासंदर्भात पुढील कार्यवाही करण्यासाठी आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांनी आरे रूग्णालय बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे हस्तांतरण करण्याची कार्यवाही तात्काळ करावी. याबाबत आवश्यक तो करारनामा बृहन्मुंबई महानगरपालिकेसोबत करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१११८१२११५००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANDHIR DATTA SURYAWANSHI

Digitally signed by RANDHIR DATTA SURYAWANSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agriculture and ADF Department, 2.5.4.20=26F8F5ACD62C6C81CBBF4ADE82E5A69A52233D9FDDE86D1600DEAC988BF231F7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=97FBF2B8BE63A470F6483AEC6D4B0E42613AB19BFD9A6CC71592ECC9150571D5, cn=RANDHIR DATTA SURYAWANSHI
Date: 2025.06.11 18:13:10 +05'30'

**(रणधीर सुर्यवंशी)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
२. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई

**प्रत:**

१. मा.मंत्री (दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय, मुंबई
३. सचिव,(पदुम) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय्य सहायक,मुंबई
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, आरे